आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागासवर्गीय कल्याण शिर्षांतर्गत निधी वितरण. (लेखाशीर्ष २४२५ ०८५३)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : -**२४** जानेवारी,२०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र, क्र.आविम/ लेखा-३१/ २१-२२/ तरतूद वितरीत/ ३३२४/ २०२२ नाशिक-२, दि.१७.१२.२०२१.
३) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.आविवि-२०२२/प्र.क्र.१७/का-३.

**प्रस्तावना :-**

आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये खर्चाचे प्राधान्यक्रम ठरवून वित्तीय उपाययोजना करण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर कार्यक्रम खर्चाच्या योजनांकरीता वेतन वगळता इतर सर्व उद्दीष्टांसाठी अर्थसंकल्पित तरतूदींच्या ५० टक्के मर्यादेतील तरतूदी वितरणासाठी उपलब्ध करून दिल्या आहेत.

या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाच्या कार्यालयीन खर्चाच्या बाबींसाठी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर उपलब्ध ५० टक्के मर्यादेत निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.टी-५ मधील २४२५-सहकार या मुख्य लेखाशिर्षांतर्गत महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य या योजनेसाठी अर्थसंकल्पित तरतुदींमधून खालीलप्रमाणे रु.२००.०० लाख निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| योजनेचे नांव व लेखाशीर्ष | बाब क्रमांक | सन २०२१-२२ अर्थसंकल्पित तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाला वित्तीय सहाय्य (२४२५ ०८५३) | ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ४००.०० | २००.०० |

२. सदर निधी संबंधीत नियंत्रक अधिकरी तथा आयुक्त आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. नियंत्रक अधिकारी यांनी वितरीत तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करून दिलेल्या मर्यादेत निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१२५७०५३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.01.24 16:45:23 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.,नाशिक.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. उपसचिव/कक्ष अधिकारी (का-३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.